सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: पुरमा-२०१९/प्र.क्र.३७/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: ०४ ऑक्टोबर, २०१९.

**संदर्भ:-** १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. १ एप्रिल, २०१९.
२) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ- २०१८/प्र.क्र. ७२/का-७अ, दि. १७ डिसेंबर,२०१८.
३) शासन परिपत्रक, महिला व बाल विकास विभाग क्र.मबाआ- २०१८/प्र.क्र. ७२/का-७अ, दि. ८ मार्च,२०१९.
४) शासन निर्णय,महिला व बाल विकास विभाग,क्र.मबाआ-२०१९/प्र.क्र.३१/का७-अ, दिनांक २५ एप्रिल,२०१९.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि. ८ जुलै, २०१९.
६) शासन निर्णय,महिला व बाल विकास विभाग,क्र.मबाआ-२०१९/प्र.क्र.३१/का७-अ, दिनांक १ ऑगस्ट,२०१९.

**प्रस्तावना:**

एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना सन १९७५-७६ या वर्षापासून राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने सन २०१९-२० या वर्षाकरिता वेतनाकरिता रु. ३१९.७८ कोटी एवढा APIP मंजूर केला असून त्यापैकी बदलेल्या प्रमाणानुसार केंद्र शासनाने त्यांचा हिस्सा रु. ७९.९४ कोटी एवढा देय केलेला आहे. सन २०१९-२० या वर्षाकरिता वेतनाकरिता जुन २०१९ च्या अधिवेशनामध्ये रुपये २१३.०१ कोटी एवढ्या रकमेचा पुरवणी मागणीचा प्रस्ताव मंजूर झाला आहे. सदर रकमेच्या ६० % रक्कम वितरीत करण्यास वित्त विभागाने मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर प्रयोजनाकरिता निधी वितरीत करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार अंतर्गत एकात्मिक बाल विकास सेवा योजनेंतर्गत कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांचे वेतनाकरिता संबधित लेखाशीर्षाखाली सदर शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामधील स्तंभ क्र-६ मध्ये नमूद केल्यानुसार निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे राहतील त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-५ येथील दिनांक ८.७.२०१९ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची, केंद्र शासनाच्या मागदर्शक सूचनांचे तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. १४७/१४७२ दि.२३/०८/२०१९ व वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१२६/व्यय-६ दि.६/०९/२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९१००४१४४५४२४८३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: CN = Lalsing Ramchandra Gujar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Development Department
Date: 2019.10.11 12:50:20 +05'30'

**(ला.रा.गुजर)**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
४) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
५) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी(महिला व बाल विकास), जिल्हा परिषद ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
६) सर्व विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
९) सर्व तालुका कोषागार अधिकारी( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
१०) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी, ( आयुक्तालय,ए.बा.वि.से.यो.नवी मुंबई मार्फत )
११) कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) कक्ष अधिकारी(का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१३) निवड नस्ती-का-७ अ

**शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. पुरमा-२०१९/प्र.क्र.३७/का-७ अ,**
**दिनांक ०४ ऑक्टोबर,२०१९ सोबतचे विवरणपत्र**

**(रुपये लाखात)**

| नवीन लेखाशिर्ष | बाब | अर्थसंकल्पीत निधी | ६०% च्या मर्यादेत वितरीत केलेला निधी | पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध निधी | पुरवणी मागणीच्या ६०% च्या मर्यादेत वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|---|---|
| .१. | .२. | .३. | .४. | .५. | .६. |
| २२३६२१३७ (केंद्र) २५% | ०१-वेतन | १०१२.०० | ६०७.२० | ९३७.०० | ५६२.२० |
| २२३६२१४६ (राज्य) ७५% | ०१-वेतन | ३०३६.०० | १८२१.६० | २८११.०० | १६८६.६० |
| २२३६२१५५ (केंद्र)२५% | ३६-सहा. अनुदाने (वेतन) | २५०७.०० | १५०४.२० | ३४५३.०० | २०७१.८० |
| २२३६२१६४ (राज्य) ७५% | ३६-सहा. अनुदाने (वेतन) | ७५२१.०० | ४५१२.६० | १०३५९.०० | ६२१५.४० |
| २२३६२१७३ (अतिरिक्त राज्य हिस्सा) १००% | ३६-सहा. अनुदाने (वेतन) | ४४३८.९२ | २६६३.३५ | ३७४१.२८ | २२४४.७७ |
| एकूण | | १९६१६.८८ | ११७७०.१३ | २१३०१.२८ | १२७८०.७७ |

Lalsing
Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: CN = Lalsing Ramchandra Gujar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Women And Child Development Department
Date: 2019.10.11 12:50:34 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**